अधिक्षक अभियंता (स्थापत्य) या निम्न संवर्गातून मुख्य अभियंता (स्थापत्य) या वरिष्ठ संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-३१२४/प्र.क्र.२४(२)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०३ मार्च, २०२५.

**संदर्भ :** सा.बां.विभाग, अधिसूचना क्रमांक : आरटीआर-१०८३/(५७३)(१)/आस्था-१, दि.२०.०६.१९८६.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागातील अधीक्षक अभियंता (स्थापत्य) (वेतनसंरचना एस-२५ : रु.७८८००-२०९२००) या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांना संदर्भाधिन शासन अधिसूचनेन्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार, मुख्य अभियंता (स्थापत्य) (वेतनसंरचना एस-२९ : रु.१३११००-२१६६००) या वरिष्ठ संवर्गात सन २०२३-२४ च्या निवडसूचीमधून ज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. मुख्य अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रात त्यांच्या नावांसमोर स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्ये. क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव व जात प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | ११९<br>२७.०७.२०२३ | श्री. सुरेंद्र लक्ष्मण टोपले. (अ.ज.) | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई. | मुख्य अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई. (श्री. गोसावी यांच्या जागी) |
| २ | १३५<br>२७.०७.२०२३ | श्रीमती छाया मोहन नाईक. (अ.जा.) | पदस्थापनेच्या प्रतिक्षेत. | मुख्य अभियंता, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई (रिक्त पदी) |

२. वर नमूद अधिकाऱ्यांची तात्पुरती नियमित पदोन्नती पुढे नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

i. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. वर नमूद अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांनी कमीत-कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांने पदोन्नती आदेश निघाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक आहे. संबंधित अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहित मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. **संबंधित अधिकारी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहित मुदतीत अथवा पूर्व मान्यतेने रुजू होण्यासाठी मंजूर केलेल्या वाढीव कालावधीत रूजू न झाल्यास, त्यांना पदोन्नतीत स्वारस्य नाही, असे समजून संबंधित अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीचे आदेश आपोआप रद्द झाल्याचे समजण्यात येतील.**

५. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, विहित कालावधीत संबंधित अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. या आदेशान्वये पदोन्नती / पदस्थापना देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांचे, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

६. संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

७. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

८. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. वेतननिश्चितीबाबत संबंधित अधिकाऱ्यांनी विहित मुदतीत विकल्प न दिल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून त्यांची पदोन्नतीच्या पदाची वेतननिश्चिती करण्यात येईल.

९. वरील आदेशान्वये पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांची पदस्थापना, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व दि.१६.०२.२०१८ मधील परिच्छेद क्र.५ (अ) (६) मधील तरतूदीनुसार संवर्ग नियंत्रण विभाग म्हणून विभागामार्फत करण्यात येत आहे.

१०. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

११. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०३१७२९१५०३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2025.03.03 17:30:08 +05'30'

**( द. व. खारके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री (सार्वजनिक उपक्रम) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
७. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोंकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर / राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
९. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे,
११. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
१२. संबंधित अधिकारी यांना संबंधित मुख्य अभियंता यांच्या कार्यालयामार्फत,
१३. संचालक (उपवने व उद्याने), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी..............,
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. कार्यासन अधिकारी (का.-१३ /१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१८. मा. राज्यमंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१९. मा. राज्यमंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२०. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२१. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२२. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. कार्यासन अधिकारी ( आस्था-१ / आस्था-२ / सेवा-६ /संगणक कक्ष), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. निवडनस्ती.